**“मैत्री” कक्षासाठी महाराष्ट्र औद्योगि विकास महामंडळाने संगणक विषयक केलेल्या खर्चाची रक्कम अदा करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. मेइम-२०१७/प्र.क्र. ५३ /उद्योग-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ मार्च, २०१७

**वाचा:-** १) शासन निर्णय क्र.इ बीज-२०१३/ प्र.क्र.११७/ उद्योग-८ दिनांक १/३/२०१४
२) शासन निर्णय क्र. मेइम-२०१५/ प्र.क्र.१०५ / उद्योग-८ दिनांक ११/२/२०१६
३) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उ.सं. मैत्री कक्ष /संगणक विषयक खर्च देयक/ २०१७/दिनांक १६/०२/२०१७.

**प्रस्तावना:-**

राज्याच्या औद्योगिक धोरणानुसार राज्य शासनाने दि. २७/०२/२०१४ पासून राज्यात गुंतवणूक करण्यास इच्छुक असलेल्या गुंतवणूकदारांना सहाय्य करण्यासाठी एकात्मिक सुलभता कक्ष (महाराष्ट्र उद्योग व्यापार आणि गुंतवणूक सुविधा केंद्र) “मैत्री कक्ष” मुंबई येथे स्थापन करण्यात आला आहे.सदर कक्षाच्या संगणक विषयक बाबींच्या खर्चाच्या रकमा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने अदा केल्याने सदर रकमेची प्रतीपूर्ती करण्याबाबतचा प्रस्ताव उद्योग संचालनालयाने दि. १६/०२/२०१७ च्या पत्रान्वये सादर केला आहे. दि. ११/०२/२०१६ च्या संदर्भ २ वरील शासन निर्णयानुसार महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने अदा केलेल्या संगणक विषयक बाबींच्या खर्चाच्या रकमांची प्रतीपूर्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालील प्रमाण शासन निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय:-**

“मैत्री” कक्षासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने संगणक विषयक बाबींसाठी दि. २७/०२/२०१३ ते दि. १०/०२/२०१७ पर्यंत केलेला खर्च रु. २५,३९,५४४/- (पंचवीस लक्ष एकोणचाळीस हजार पाचशे चव्वेचाळीस फक्त) सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून अदा करण्यास शासन कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च “मागणी क्र. के-७, मुख्य लेखाशीर्ष-२८५२, उद्योग, ८०, सर्वसाधारण, १०२ औद्योगिक उत्पादकता, ( ०० ) (१५) "मैत्री कक्षाकरिता खर्च (योजनांतर्गत) २८५२ ए ०२२ ) ” या लेखाशीर्षाखाली उपशिर्ष १७ संगणक खर्चासाठी सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२१३विनियम, भाग-१ दिनांक १७/४/२०१५ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग

पहिला, उप विभाग १ मधील अनुक्रमांक -२७ अ नियम क्र. ७६ अनुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०३०३१५०८२३९११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Shraddha Deven Kocharekar

Digitally signed by Shraddha Deven Kocharekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IELD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, cn=Shraddha Deven Kocharekar
Date: 2017.03.03 15:09:20 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विकास आयुक्त ( उद्योग ) तथा अध्यक्ष मैत्री, उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई.
३) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
४) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
५) सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) उपसचिव ( प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६ / अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२.
९) कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवड नस्ती ( उद्योग-८).